प्राचार्य, शासकीय तंत्रनिकेतन, महाराष्ट्र तंत्रनिकेतन शिक्षक सेवा गट-अ या पदावर नामनिर्देशनाने नियुक्तीबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः ससेनि-३२१७/प्र.क्र.११२/१७/तांशि -७**

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक:-१८ सप्टेंबर, २०१८

संदर्भ :- १) सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्रमांक : एसआरव्ही-२०१५/ प्र.क्र.१५६/ कार्या.१२, दि.८ मे, २०१५ व शासन अधिसूचना दि.१५ जून, २०१७.

२) महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे पत्र क्र.१५ (१) (६४) /१८७/सात-अ, दि. २७ नोव्हेंबर, २०१७ चे पत्र.

३) विभागाचा समक्रमांकाचा शासन निर्णय, दि. २० जुलै, २०१८ चे पत्र.

**शासन निर्णय :-**

प्राचार्य, शासकीय तंत्रनिकेतन, महाराष्ट्र तंत्रनिकेतन शिक्षक सेवा, गट-अ या पदावर नियुक्ती करीता संदर्भाधीन क्र.२ येथील पत्राद्वारे १४ उमेदवारांची शिफारस केलेली आहे. त्यापैकी या पदावर महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत ०९ उमेदवारांची संदर्भाधिन क्र.०३ येथील शासन निर्णयाव्दारे नियुक्ती करण्यात आली आहे. तरी या शासन निर्णयाव्दारे खाली नमुद ०१ उमेदवाराची त्यांच्या नावासमोर रकाना क्र. ०६ मध्ये दर्शविलेल्या ठिकाणी ते ज्या दिनांकास त्यांच्या पदाचा कार्यभार स्विकारतील त्या दिनांकापासून दोन वर्षाच्या परिविक्षा कालावधीसाठी तात्पुरती नियुक्ती करण्यात येत आहे.

| गुण. क्र. | आयोग पुरस्कृत उमेदवाराचे नांव | वर्गवारी | आयोगाने शिफारस केलेला प्रवर्ग | वाटप केलेला महसूली विभाग | नियुक्तीचे ठिकाण |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| ३ | श्री. उपाध्याय अशोक लक्ष्मीशंकर | खुला | खुला | नागपूर | शासकीय तंत्रनिकेतन, साकोली |

०२. उपरोक्त उमेदवारास संबंधित वैद्यकीय मंडळाने वैद्यकीय दृष्ट्या शासकीय सेवेसाठी पात्र ठरविले आहे. तशी नोंद त्यांच्या सेवा पुस्तकात घेण्यात यावी.

०३. उपरोक्त उमेदवाराचे चारित्र्य पडताळणी अहवाल व साक्षांकन नमुना पोलीसांकडून प्राप्त झाला असून त्यांच्या विरूद्द कोणताही दंड व शिक्षा असलेबाबतची नोंद आढळून येत नसल्याचे कळविले आहे.

०४. उपरोक्त उमेदवार शासकीय सेवेत कार्यरत आहेत त्यांना गोपनिय अहवाल न पाहता नियुक्ती देण्यात येत आहे. सदर उमेदवाराची गेल्या पाच वर्षातील गोपनिय अहवाल तपासण्याची जबाबदारी त्यांना नियुक्ती देण्यात आलेल्या संस्था प्रमुखांवर सोपविण्यात येत आहे. त्यांचे गोपनीय अहवालामध्ये प्रतिकूल शेरे आढळून आल्यास त्यांची नियुक्ती रद्द करण्यात येईल.

०५. उपरोक्त उमेदवाराची, प्राचार्य, शासकीय तंत्रनिकेतन, महाराष्ट्र तंत्रनिकेतन शिक्षक सेवा, गट-अ या पदावर ते प्रत्यक्ष हजर झाल्याच्या दिनांकापासून, नामनिर्देशनाने, निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात खालील अटी व शर्तींच्या अधिन राहून नियुक्ती करण्यात येत आहे :-

१) सदर उमेदवाराची वेतनश्रेणी रु. ३७,४००-६७,०००/- या पे बँड व उच्च व तंत्रशिक्षण विभाग शासन निर्णय क्र. एसपीसी-२०१०/(३४/१०)/तांशि-२ दि. २०/०८/२०१० मध्ये नमुद एजीपी मध्ये राहील.

२) सदर वेतनश्रेणीव्यतिरिक्त शासन वेळोवेळी ठरवेल त्या दराने महागाई भत्ता, घरभाडे भत्ता व स्थानिक पूरक भत्ता अनुज्ञेय राहील.

३) सदर उमेदवारास प्रथम वेतनवाढ परिविक्षा कालावधीतील एक वर्ष पूर्ण झाल्यानंतर देण्यात येईल व त्यानंतरची वेतनवाढ परिविक्षा कालावधी समाधानकारकरीत्या पूर्ण केल्यानंतर मिळेल.

४) सदर उमेदवाराचे परिविक्षा कालावधीतील काम किंवा वर्तणूक अयोग्य, अपेक्षित दर्जाची नसल्यास अथवा असमाधानकारक आढळल्यास त्यांची सेवा कोणतीही पूर्वसूचना न देता समाप्त करण्यात येईल अथवा सेवेतून कमी करण्यास ते पात्र ठरतील.

५) सदर उमेदवाराची नियुक्ती सरळ सेवाप्रवेश नियुक्तीसाठी विहीत केलेल्या नियमाच्या अधीन राहून ते यापूर्वी हिंदी व मराठी भाषेच्या परीक्षा उत्तीर्ण झालेले नसल्यास किंवा त्या परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून सूट मिळाली नसल्यास त्या परीक्षा त्यांना विहीत मुदतीत उत्तीर्ण होणे आवश्यक आहे. तसे न झाल्यास त्यांची वेतनवाढ रोखून ठेवण्यात येईल.

६) उपरोक्त उमेदवार महाराष्ट्र शासनाच्या सेवेत कार्यरत असल्याने सदर उमेदवाराचे परिवीक्षाधीन काळातील वेतन महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियमावली, १९८१ च्या नियम ११ नुसार निश्चित करून महाराष्ट्र नागरी सेवा वेतन नियमावली १९८१ च्या नियम ३९.१ मधील पहिल्या परंतुकानुसार त्यांना परिविक्षाधीन काळात वेतनवाढ अनुज्ञेय राहील व त्यांचे नवीन पदावरील प्रारंभीक वेतन वित्त विभाग, शासन निर्णय क्र.वेतन-१२८९/प्र.क्र.२/९०/सेवा-३,दि.२३ मार्च, १९९४ मधील तरतुदीनुसार निश्चित करण्यात यावे.

७) उपरोक्त उमेदवाराने त्यांच्या नावासमोर निर्देशिलेल्या पदावर आदेशाच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत तात्काळ रुजु व्हावे. सदर विहीत मुदतीत जर त्यांनी नियुक्ती स्विकारली नाही तर आयोगाने घेतलेल्या परीक्षेत त्यांनी मिळविलेल्या गुणवत्ताक्रमानुसार त्यांना अनुज्ञेय असलेली ज्येष्ठता मिळणार नाही शिवाय प्रस्तुत नियुक्तीच्या संदर्भात त्यांनी वरील मुदतीत शासनास काहीही कळविले नाही तर, कोणतीही पूर्वसूचना न देता त्यांच्या नियुक्तीचे सदरचे आदेश रद्द करण्यात येतील.

८) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अंनियो-१००९/प्र.क्र.३२/सेवा-४, दि. १८/०८/२००९ मधील तरतुदीनुसार दि. १ नोव्हेंबर, २००५ पूर्वी शासन सेवेत निवृत्तीवेतनार्ह आस्थापनेवर कार्यरत असलेल्या शासकीय कर्मचा-यांने त्याच किंवा अन्य विभागातील निवृत्तीवेतनार्ह आस्थापनेच्या पदावरील नियुक्तीसाठी दि. १ नोव्हेंबर,२००५ पूर्वी किंवा त्यानंतर अर्ज केला असेल आणि त्याला दि. १ नोव्हेंबर, २००५ रोजी किंवा त्यानंतर नवीन पदावर नियुक्त करण्यात आले असेल तर अशा प्रकरणी शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक: अंनियो-१००६/८७/सेवा-४, दि.१२ जानेवारी, २००७ मधील (i) ते (iv) येथे नमूद केलेल्य सर्व अटींची पूर्तता झाल्यास संबंधीत शासकीय कर्मचा-यास महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन), नियम, १९८२ व सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी योजना लागू ठरतील. दि. १८/०८/२००९ च्या परिपत्रकात नमूद (i) ते (iv) येथील सर्व अटींची पूर्तता ज्या प्रकरणी होत नसेल, अशा शासकीय कर्मचा-यास नवीन राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजना लागू ठरतील.

९) सदर उमेदवाराचे सेवानिवृत्तीचे वय प्रचलित नियमानुसार राहील.

१०) उपरोक्त उमेदवारास नियुक्तीच्या ठिकाणी उपस्थित राहण्यासाठी प्रवासभत्ता देण्यात येणार नाही. तथापी, सध्या सदर उमेदवार शासन सेवेत कार्यरत असल्याने त्यांना पदग्रहण कालावधी अनुज्ञेय राहील.

११) सदर उमेदवाराने नोकरी सोडण्यापूर्वी शासनास एक महिन्याची पूर्वसुचना देणे अथवा एक महिन्याचे वेतन देणे आवश्यक आहे.

०६. सदर नियुक्ती उपरोक्त उमेदवाराने सादर केलेल्या प्रमाणपत्रांच्या सत्यासत्यतेवर अवलंबुन राहील. सदर प्रमाणपत्र नियुक्तीनंतर खोटे अथवा बनावट आढळल्यास सदर उमेदवाराची नियुक्ती आपोआप संपुष्टात येईल.

०७. हे आदेश प्राप्त होताच संबधित उमेदवाराने नियुक्तीच्या ठिकाणी हजर व्हावे व त्याबाबतचा अहवाल संबधित संस्थाप्रमुखाकडे सादर करावा. संस्थाप्रमुखांनी त्याबाबतचा अहवाल संचालकामार्फत शासनास सादर करावा.

०८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०९१८१२२१५७८४०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sudhir Jaya Shetty

Digitally signed by Sudhir Jaya Shetty
DN: CN = Sudhir Jaya Shetty, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Higher And Technical Education Department
Date: 2018.09.18 12:28:40 +05'30'

**( सुधीर जया शेट्टी )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

संबंधित उमेदवार (नोंदणीकृत डाकेने) (e-mail द्वारे)

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
२. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राव्दारे).
३. मा. मंत्री, उच्च व तंत्रशिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.राज्यमंत्री, उच्च व तंत्रशिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. सचिव, उच्च व तंत्रशिक्षण विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
६. संचालक, तंत्रशिक्षण, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७. सर्व सहसंचालक तंत्र शिक्षण, विभागीय कार्यालय.(तंत्र शिक्षण संचालनालया मार्फत)
८. प्राचार्य, शासकीय तंत्रनिकेतन, साकोली.
९. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
१०. जिल्हा कोषागार अधिकारी, भंडारा.
११. निवड नस्ती (तांशि-७).